मानव विकास कार्यक्रम सन २०२०-२१ ते २०२२-२३ या आर्थिक वर्षात पुढे चालु ठेवण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
**शासन निर्णय क्रमांक : माविका-२०१४/प्र.क्र.३५/का.१४१८,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ मार्च, २०२०.

वाचा :

१. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.ममावि-२०११/प्र.क्र.२१/का.१४१८, दि.१३.०४.२०११.

२. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८, दि.१९.०७.२०११.

३. नियोजन विभागाचे पत्र क्र. माविका-२०१४/प्र.क्र.३५/का.१४१८, दि.२३.०२.२०१७.

प्रस्तावना :

नियोजन विभाग, शासन निर्णय दि.१३.०४.२०११ अन्वये मानव विकास संकल्पना जिल्ह्याएवजी “तालुका” स्तरावर राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला असून; तालुकानिहाय मानव विकास निर्देशांकाची निश्चिती करण्याकरीता “यशदा, पुणे” या संस्थेची नेमणुक केली आहे. नियोजन विभाग, शासन निर्णय दि.१९.०७.२०११ अन्वये सन २०११-१२ पासून मानव विकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील २३ जिल्ह्यांत निवडलेल्या १२५ तालुक्यांत “(i) आरोग्य, (ii) शिक्षण व (iii) उत्पन्नवाढ” या ३ क्षेत्रांशी संबंधित विविध योजना राज्य व जिल्हा/तालुका स्तरावर राबविण्यात येत आहेत.

२. नियोजन विभाग, शासन निर्णय दि.१९.०७.२०११ यातील मुद्दा क्रमांक ४ (iv) मधील तरतूदीनुसार “यशदा, पुणे” या संस्थेने राज्याचा “मानव विकास अहवाल” तयार केल्यानंतर त्यातील मानव विकास निर्देशांकावर आधारित “तालुक्यांच्या” निवडीत यथोचित सुधारणा करण्यात येईल, असे स्पष्ट करण्यात आले आहे.

३. नियोजन विभाग, पत्र दि.२३.०२.२०१७ अन्वये “मानव विकास कार्यक्रम” २३ जिल्ह्यांतील १२५ तालुक्यांत राबविण्यास सन २०१९-२० या वित्तिय वर्षात पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

४.  नियोजन विभाग, शासन निर्णय दि.१९.०७.२०११ ला अनुसरुन “मानव विकास कार्यक्रम” संदर्भात “यशदा, पुणे” यांच्या कडून आंतरराष्ट्रीय मानके जसे (i) मासिक दरडोई उपभोगता खर्च, (ii) आरोग्य व (iii) शिक्षण यावर आधारीत राज्यातील ३५६ तालुक्यांचा “मानव विकास निर्देशांक” बाबत अहवालाच्या पार्श्वभूमीवर राज्याचे एंकदरीत विकासाला अधिक गती देण्याकरीता नियोजन विभागाकडून करण्यात आलेल्या सादरीकरणाप्रमाणे “मानव विकास कार्यक्रमाचे” विस्तारीकरण व बळकटीकरण करुन “संयुक्त राष्ट्र (United Nations)” यांच्या कडून निर्धारीत करण्यात आलेली “शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals)” २०३० पर्यंत साध्य करण्याचे उद्दिष्ट पूर्तीकरीता मानव विकास निर्देशांकाबाबतचा अहवाल प्राप्त झाल्यावर मानव विकास निर्देशांकांत कमी असलेले “तालुके” निवडुन “मानव विकास कार्यक्रम” ची “मुळ रचना (Original Framework)” मध्ये बदल करण्याबाबत प्रक्रीया पुर्ण करण्यास काही कालावधी लागणार आहे. “मानव विकास कार्यक्रम” अंतर्गत राज्यातील निवडलेल्या १२५ अविकसित व मागास तालुक्यांमध्ये विविध योजना राबविल्यामुळे संबंधित तालुक्यांतील लोकांच्या “आरोग्य, शिक्षण व उत्पन्नवाढ” या ३ क्षेत्रांचा विकास दर वाढविण्यास चांगले परिणाम दिसून आलेले आहेत. या पार्श्वभूमीवर “मानव विकास कार्यक्रम” सन २०२०-२१ पासून पुढील ३ वर्षाकरीता तालुकास्तरावर राबविण्याच्या दृष्टीने मानव विकास कार्यक्रमाचे विस्तारीकरण व बळकटीकरण प्राधान्याने पूर्ण करण्यात येत आहे. “मानव विकास कार्यक्रम” ची मुदत दि.३१.०३.२०२० रोजी संपुष्टात येत असल्याने; सदर कार्यक्रमास मुदतवाढ देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

“संयुक्त राष्ट्र (United Nations)” यांच्याकडून निर्धारीत करण्यात आलेली “शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals)” २०३० पर्यंत साध्य करण्याचे उद्दिष्ट पूर्तीकरीता व मानव विकास कार्यक्रमाचे विस्तारीकरण व बळकटीकरण करुन “तालुका” स्तरावर (i) आरोग्य, (ii) शिक्षण व (iii) उत्पन्नवाढ या ३ क्षेत्रांच्या विकासदरात वाढ करण्याचे उद्दीष्ट साध्य करुन “मानव विकास निर्देशाक” उंचावण्यास प्रभावी ठरण्याच्या दृष्टिकोनातून “मानव विकास कार्यक्रम” सन २०२०-२१ ते सन २०२२-२३ या ३ वर्षासाठी पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून; त्याचा संगणक संकेतांक २०२००३१११५३०५११९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2020.03.11 15:34:31 +05'30'

**( वि. फ. वसावे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता (विधान सभा / विधान परिषद), विधानभवन, मुंबई
६. महालेखापाल (लेखापरीक्षा /लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर, महाराष्ट्र - १/२
७. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय,मुंबई
९. प्रधान सचिव (नवि-२), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव, महिला व बालकल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. आयुक्त, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१३. आयुक्त, मानव विकास आयुक्तालय, पहिला मजला, विकास भवन, अदालत रोड, औरंगाबाद
१४. महासंचालक, यशदा, पुणे
१५. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
१६. जिल्हाधिकारी (सर्व)
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१८. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१९. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२०. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
२१. जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), जिल्हा मानव विकास समिती (संबंधित २३ जिल्हे)
२२. गट विकास अधिकारी, पंचायत समिती (संबधित तालुके)
२३. मुख्याधिकारी, नगरपालिका/नगरपरिषद (संबंधित)
२४. मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (सर्व)
२५. सह सचिव/ उपसचिव (सर्व), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२६. निवड नस्ती.